कोरपना पंचायत समिती जिल्हा चंद्रपूर प्रशासकीय इमारतीच्या ठिकाणी अंतर्गत फर्निचर, पाण्याची व्यवस्था, बैठक व्यवस्था व इतर सुविधेच्या कामांस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः पंसई-२०१८/प्र.क्र. ८८/बांधकाम-४
मर्झबान पथ, २५ बांधकाम भवन,
फोर्ट, मुंबई- ४०० ००१
तारीख: ४ जुलै, २०१८

वाचा :- १) शासन निर्णय क्र. पंसई २०१२/ प्र.क्र. ११४/ पंरा-७ दि. ०५.१२.२०१२
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, चंद्रपूर यांचे पत्र क्र. बांवि/ पिओ.७/१०२२/२०१८ दि. ५.४.२०१८ चे पत्र.

प्रस्तावना :-

१. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, चंद्रपूर यांनी संदर्भीय पत्रान्वये कोरपना पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारतीच्या ठिकाणी अंतर्गत फर्निचर, पाण्याची व्यवस्था, बैठक व्यवस्था व इतर सुविधेच्या कामांस प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली आहे.

२. कोरपना पंचायत समिती जिल्हा चंद्रपूर नवीन प्रशासकीय इमारत बांधकामास दिनांक **०५.१२.२०१२** च्या शासन निर्णयान्वये रु. २४१.७२ लक्ष इतक्या रक्कमेची प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून प्रशासकीय मान्यते एवढा निधी जिल्हा परिषदेला वितरीत करण्यात आलेला आहे. कोरपना पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारतीचे बांधकाम पूर्ण झाले असून त्या ठिकाणी दैनंदीन कामकाज सुरु करण्याच्या दृष्टीने अंतर्गत फर्निचर, पाण्याची व्यवस्था, बैठक व्यवस्था व इतर सुविधेच्या कामाची नितांत आवश्यकता आहे.

**३.** कोरपना पंचायत समितीकरीता नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकाम मंजूर करतेवेळी अंदाजपत्रकामध्ये अंतर्गत फर्निचर, पाण्याची व्यवस्था, बैठक व्यवस्था व इतर सुविधेच्या बाबी अंतर्भूत करण्यात आलेल्या नव्हत्या. याकरीता, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, चंद्रपूर यांनी रुपये १,५३,०७,०००/- इतक्या किंमतीचे सविस्तर अंदाजपत्रक सादर केले आहे. सदरील अंदाजपत्रकांस कार्यकारी अभियंता (बांध.) जिल्हा परिषद चंद्रपूर यांची तांत्रिक मान्यता घेण्यात आली आहे.

**४.** मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, चंद्रपूर यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या तांत्रिक छाननी अंती, कोरपना पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीच्या ठिकाणी अंतर्गत फर्निचर, पाण्याची व्यवस्था, बैठक व्यवस्था व इतर सुविधेच्या कामांस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत रुपये १५३.०७ लक्ष इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

५. कोरपना पंचायत समिती जिल्हा चंद्रपूर पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारतीच्या ठिकाणी अंतर्गत फर्निचर, बैठक व्यवस्था व इतर सुविधेच्या कामांस एकूण रक्कम रुपये **१,५३,०७,०००/-** (रुपये एक कोटी त्रेपन्न लक्ष सात हजार फक्त) इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या कामांस पुढील अटींच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

१) कोरपना पंचायत समितीच्या ठिकाणी शासन निर्णय, सा.बां.वि.क्र.सीएटी-१०९६/प्र.क्र.१७२/ इमारती-२, दि.७.१.२००४ नुसार विहीत केलेल्या नोंदणीकृत फर्निचर /मॉड्युलर फर्निचर उत्पादक अथवा पुरवठादार/ अंतर्गत सजावटकार यांच्याकडून विहीत कार्यपध्दती अनुसरुन फर्निचरचे काम करुन घेणे बंधनकारक राहील.

२) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रशासकीय मान्यता किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प. यांनी दक्षता घ्यावी.

३) या कामी प्रशासकीय मान्यता किंमतीपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो पंचायत समिती/ जिल्हा परिषदेने सोसावा.

४) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त एका वर्षात पूर्ण होईल, असे संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प. यांनी नियोजन करावे.

५) प्रस्तुत कामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.) जि.प. यांनी दक्षता घ्यावी.

६. कोरपना पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारतीच्या अंतर्गत फर्निचर, बैठक व्यवस्था व इतर सुविधेच्या कामाच्या अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढील प्रमाणे आहे:-

| FINAL GENRAL ABSTACT FOR KORAPANA P.S. INTERNAL FURNITURE, WATER SUPPLY, SEATTING ARRENGMENT AND OTHER FACILITY WORKS | | |
|---|---|---|
| Sr. | Description of item | Cost Rs. |
| 1 | Interior Furnishing with Modular Furniture works | 9992500.00 |
| 2 | Fencing work and Paving Block work | 2492050.00 |
| 3 | Water Supply Arrangement | 2821997.00 |
| | Total Rs. | 15306547.00 |
| | Says Rs. | 15307000.00 |

**७.** उपरोक्त बांधकामासाठी संबधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरुपात टप्प्या-टप्प्याने निधी उपलब्ध करुन दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यांत येईल. यावरील खर्च " **२५१५**-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम **१०१**, पंचायती राज **३१** सहाय्यक अनुदाने **(०१) (०३)** जिल्हा परिषदांच्या इमारती

बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (**२५१५ ००५३**) " या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

८. प्रस्तुत कामाची माहिती कंस्ट्रक्शन ट्रॅकर प्रणालीवर अद्ययावत करावी.

९. प्रस्तुतचा शासन निर्णय वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, **१९७८**, भाग पहिला, उप विभाग-पांच, अ.क्र.**१** महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.**१३४** खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८०७०४१५३७५७३४२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dilip Babasaheb Patil

Digitally signed by Dilip Babasaheb Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development And Water Conservation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e461e0a32ec649f0a60e4372f7cbbb3edff433d33cc0d95db6f8dbf1fa4f7f, cn=Dilip Babasaheb Patil
Date: 2018.07.04 16:34:49 +05'30'

( दि.बा पाटील )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा / विधानपरिषद
२) विभागीय आयुक्त नागपूर, विभाग नागपूर
३) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
४) मुख्य अभियंता, प्र.मं.ग्रा.स.यो.,कॅम्प ऑफिस, मध्यवर्ती इमारत, पुणे
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद चंद्रपूर
६) अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद चंद्रपूर
७) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद चंद्रपूर
८) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद चंद्रपूर
९) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा चंद्रपूर
१०) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
११) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा चंद्रपूर विभाग, चंद्रपूर
१२) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, चंद्रपूर
१३) सभापती, पंचायत समिती, कोरपना जिल्हा चंद्रपूर
१४) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, कोरपना जिल्हा चंद्रपूर
१५) निवडनस्ती-बांधकाम-४